Convertion in Regular Temparary Establishment:- Shri Namdev A.Kaninde working under Superintending Engineer, Jalvidnyan Prakalpa Mandal, Nashik

कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदांचे अस्थायी आस्थापनेवरील पदांमध्ये रुपांतरण-- **श्री. नामदेव अं. कानिंदे, जलविज्ञान प्रकल्प मंडळ, (संकलन )नाशिक**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. एसयुटी-२००९/ (१७९/२००९)/आ(कामगार)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ३१/३/२०११

**पहावे** :- १)अधीक्षक अभियंता, जलविज्ञान प्रकल्प मंडळ, (संकलन ) नाशिक. यांचे पत्र जा. क्र.न्यायालयीन २००५/जाविप्रम (सं )/आ-२/११९५/२०१० दिनाक २८/४/२०१०.
२)शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.रु.अ.आ.१५९६/२२८/सेवा-५, दि.२४.४.२००१.
३) शासनाचे समक्रमांकाचे दि ११.६.२००७ चे पत्र.

**प्रस्तावना:**

अधिक्षक अभियंता, जलविज्ञान प्रकल्प मंडळ, (संकलन ) नाशिक यांच्या नियंत्रणाखालील विभागीय कार्यालय, यांनी श्री. नामदेव अंबादास कानिंदे यांची दि १.७.८७ रोजी हंगामी अकुशल कामगार म्हणून नियुक्ती केली होती. दि १.११.९२ रोजी काम उपलब्ध नसल्यामुळे त्यांना तोंडी आदेशान्वये कमी करण्यात आले होते. त्यामुळे त्यांनी सेवेत पुन्हा घेण्यासाठी मा. कामगार न्यायालय, अमरावती येथे दावा क्र: युएलपी ३१/९३ दाखल केला. सदर दाव्याचा निर्णय दि १२.३.९३ रोजी लागला या निर्णयान्वये कामगारास १५ दिवसात कामावर घेण्यात यावे असा अंतरिम आदेश झाल्याने संबंधीत कार्यालयाने शासनाची पूर्व मान्यता न घेता दि १६.२.९४ पासून त्यांना पूर्ववत कामावर घेतले. यानंतर शासनाने दि ११.६.०७ च्या पत्रान्वये त्यांना सेवेत पुन:स्थापित करण्यास कार्योत्तर मंजूरी दिली. त्यानंतर मूळ दावा मा. कामगार न्यायालय, यवतमाळ येथे हस्तांतरीत होऊन त्यास युएलपी क्र ५१२/९४ देण्यात आला. त्यात दि ५.१२.२००० रोजी अंतिम न्यायनिर्णय होऊन कामगारास सेवासातत्य आणि दि १.११.९२ ते दि १३.२.९४ या काम न केलेल्या कालावधीची थकबाकी देण्याचे निर्देश देण्यात आले. या निर्णयाविरोधात शासनाच्या वतीने मा. औद्योगिक न्यायालय, यवतमाळ येथे दाखल केलेला रिव्हीजन अर्ज क्र १७/०१ दि १०.७.०३ रोजी खारीज करण्यात आला व दि १२.३.९३ चा कामगार न्यायालयाचा निर्णय कायम ठेवण्यात आला. यासंदर्भात सरकारी वकीलांच्या सल्ल्याच्या अनुषंगाने विधी व न्याय विभाग, नागपूर यांचे अभिप्राय घेऊन या प्रकरणी शासनातर्फे मा. उच्च न्यायालयात अपील दाखल केलेले नाही.

ही सर्व कार्यवाही शासनस्तरावर चालू असतानाच श्री. कानिंदे यांनी त्यांना कालेलकर कराराप्रमाणे रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्यासाठी दि ११.७.०५ रोजी मा. औद्यागिक न्यायालय, यवतमाळ येथे दावा क्र यूएलपी १३४/०५ दाखल केला होता. सदर याचिकेचा अंतिम निर्णय दि २३.११.२००९ रोजी झाला असून न्यायालयाने श्री. कानिंदे यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत आणि, त्यांना सेवानिवृत्तीच्या तारखेपर्यंत पदास देय असलेले सर्व सेवाविषयक व आर्थिक लाभ देण्याबाबत निर्णय दिला. या निर्णयाच्या विरोधात मा. उच्च न्यायालयात अपिल दाखल करता येईल, असा सल्ला सरकारी वकील यांनी दिला होता. तथापि याबाबत विधी व न्याय विभाग, नागपूर यांनी प्रकरणी अपिल दाखल न करण्याबाबत व मा.औद्योगिक न्यायालय, यवतमाळ यांच्या दि २३.११.०९ च्या निर्णयाचे पालन करण्याशिवाय पर्याय नाही असे अभिप्राय दिले व

शासनाने अपिल न करता न्यायनिर्णयानुसार कार्यवाही करणेचे ठरविल्याने श्री. कनिंदे यांना कालेलकर करारातील तरतूदींप्रमाणे अकुशल हलका मजुर या पदावर रुपांतरीत अस्थाई आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

श्री. कानिंदे यांची नियुक्तीच्या दिनांकापासून म्हणजे दिनांक १.७.१९८७ पासून एका वर्षाच्या कालावधीत एकूण २४० दिवस इतकी सेवा झाली आहे. शासन निर्णय दि २४.४.२००१ मधिल तरतुदीनुसार श्री. कानिंदे यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा दिनांक ( ३०.६.१९९२ ) हा दिनांक ३१.१२.९८ पूर्वीचा येत असल्याने या प्रकरणी निर्णय घेण्यास विभाग सक्षम आहे. तथापि, श्री. कांनिदे यांची हंगामी अकुशल मजुर म्हणुन नियुक्ती झाली असल्यामुळे हंगामी कामगारांना कालेलकर कराराच्या शासन निर्णय दि. २४.४.२००१ मधिल तरतुदी लागू होत नाहीत. परंतु मा. औद्योगिक न्यायालय, यवतमाळ यांच्या दि. २३.११.०९ च्या निर्णयाची अंमलबजावणी करणे आवश्यक असल्याने श्री. नामदेव अं कानिंदे यांना खालीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र | कर्मचाऱ्यांचे नाव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकास आणावयाचे आहे तो दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री.नामदेव अ कानिंदे | रोजंदारी | हंगामी अकुशल मजुर १.७.१९८७ | १.७.१९९२ | अकुशल हलका मजूर | रु.७५०-९४० (जुनी) रु.२५५०-३२०० (५ वा वेतन आयोग ) |

२. सर्वश्री. नामदेव अ कांनिदे यांना त्यांनी धारण केलेल्या पदांवर रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत धारण केलेल्या पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांचे बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यांत येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

३. अधीक्षक अभियंता, यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासननिर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत नर्गमित करुन ते संबंधित कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचाऱ्यांचे नांव , पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे तो दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय

अधिकाऱ्यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचाऱ्याच्या व्यक्तीशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत संबंधित कर्मचाऱ्याची (नाव, पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्याच्याकडून तशा आशयाचे शासन निर्णय दि. २४.४.२००१ सोबतच्या प्रपत्र 'ब' मधील नमुन्यात हमीपत्र (Undertaking) घेवून ते त्या कर्मचाऱ्यांच्या सेवापटात /सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याबाबतीत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत /त्रुटी असल्याची संबंधित कर्मचाऱ्यांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचाऱ्यांच्या नेमणुकांच्या आदेशांच्या प्रती, हजेरी पटाच्या प्रती, आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

४. श्री. नामदेव अ कानिंदे यांना मजूर पदावर ज्या दिनांकापासून रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणले आहे त्या दिनांकापासून सेवानिवृत्ती दिनांकापर्यंत म्हणजेच दि ३१.७.०५ पर्यंतचे देय होणाऱ्या वेतन व भत्त्याच्या थकबाकीच्या रकमेपैकी १०० टक्के रक्कम ते स्वखुशीने सोडून देण्यास तयार असल्याचे हमी पत्र त्यांनी दिले आहे. त्यामुळे त्यांना सदरहू कालावधीतील वेतनाच्या फरकाची रक्कम अनुज्ञेय होणार नाही. मात्र सेवानिवृत्ती नंतरच्या कालावधीतील म्हणजे दि १.८.०५ ते अद्यापर्यंतचे अनुज्ञेय असणारे सेवा निवृत्तीविषयक लाभ अदा करण्यात यावेत. सदर लाभ त्यांना एकरकमी अदा करण्यात यावे.

५. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. रुअआ १५९६/२२८/सेवा-५, दि. २४ एप्रिल २००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन काढण्यात येत आहेत.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सांकेतांक कमांक : २०११०३३११५३१३९००१ अन्वये प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबतः प्रपत्र ब

**( अ. अ. कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत अग्रेषित :-**

वित्त विभाग (व्यय १२), मंत्रालय, मुंबई
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य १, मुंबई , महाराष्ट्र- २ नागपूर
महालेखापाल, लेखा परिक्षा , महाराष्ट्र -१,मुंबई, महाराष्ट्र-२ नागपूर
अधिक्षक अभियंता, जलविज्ञान प्रकल्प मंडळ, (संकलन ) नाशिक
कार्यकारी अभियंता, जलविज्ञान प्रकल्प मंडळ, नागपूर
आस्थापना(कामगार) संग्रहार्थ.